**राज्यातील महानगरपालिकांचे महापौर यांना**
**आतिथ्य भत्ता मंजूर करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एमएमसी-१२९७/८५५/प्र.क्र.६३/नवि-२४**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ०२ जून २००१**

**पहा :-** १) शासन पत्र क्र.एमएमसी-१२९७/८५५/प्र.क्र. ६३/नवि-२४,दि.७ मे १९९७
२) शासन निर्णय क्र.जीईएन-१०९८/प्र.क्र. २१५/९८/नवि-२४,दि.२ डिसेंबर १९९८ व दि.३० सप्टेंबर १९९९

**प्रस्तावना :-** राज्यातील महापौर यांना महानगरपालिकांनी आतिथ्य भत्ता उपलब्ध करुन देणेबाबत यापुर्वी शासनाने वेळोवेळी आदेश निर्गमित केले आहेत. त्यानुसार सध्या बृहन्मुंबई महानगरपालिका महापौर यांना वार्षिक रु.१ लाख, नागपूर महानगरपालिका महापौर यांना रु.६० हजार, व उर्वरित महानगरपालिकांच्या बबतीत ज्या महानगरपालिकांचे वार्षिक उत्पन्न रु.१०० कोटी पेक्षा जास्त आहे अशा महानगरपालिका महापौर यांना रु. ६० हजार व रु. १०० कोटी पेक्षा कमी उत्पन्न आहे अशा महानगरपालिका महापौर यांना रु. ४० हजार आतिथ्य भत्ताअनुज्ञेय आहे. महानगरपालिका महापौर यांना सध्या मिळणा-या या आतिथ्य भत्ता मर्यादेत वाढ करण्यात यावी अशी मागणी महाराष्ट्र राज्य महापौर परिषदेने शासनास केली होती. शहराची वर्गवारी, उत्पन्न इत्यादी विचारात घेवून या मागणी संबंधात निर्णय घेण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ चे कलम ३७-अ,नागपूर महानगरपालिका अधिनियम,१९४८ चे कलम २०(अ) व (ब)आणि मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १९(अ)(२) अन्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन या शासन निर्णयान्वये राज्यातील महानगरपालिकांनी महानगरपालिका महापौर यांना प्रतीवर्षी पुढीलप्रमाणे वार्षिक उत्पन्नानुसार त्यापुढे दर्शविल्याप्रमाणे आतिथ्य भत्ता उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| **महानगरपालिकांचे वार्षिक उत्पन्न** | **सुधारित अनुज्ञेय आतिथ्य भत्ता (रु.हजारात)** |
|---|---|
| रु. १०० कोटीपर्यन्त | ६० |
| रु. १०१ ते ४०० कोटी | ९० |
| रु. ४०१ ते १००० कोटी | १०० |
| रु. १००१ कोटीच्या वर | २०० |

२.	परिच्छेद १ मध्ये दर्शविल्याप्रमाणे सुधारित आतिथ्य भत्ता सन २००१-२००२ या आर्थिक वर्षापासून लागू होईल.

**महाराष्ट्राचे राज्यपाल याच्या आदेशानुसार व नांवाने,**

( तु. प. केळकर )
कक्ष अधिकारी

**प्रति,**

(१) अध्यक्ष,महाराष्ट्र महापौर परिषद तथा महापौर बृहन्मुंबई महानगरपालिका,मुंबई
(२) आयुक्त,सर्व महानगरपालिका
(३) नगर सचिव,सर्व महानगरपालिका
(४) सर्व सहसचिव/उपसचिव,नगर विकास विभाग
(५) कार्यासन नवि-२१,२२,२३,२४,नगर विकास विभाग
(६) निवडनस्ती(नवि-२४)